राज्यातील मागास जिल्ह्यांपैकी आपत्ती
प्रवण जिल्ह्यांत जिल्हा आपत्ती व्यवस्थापन
प्राधिकरणाचे बळकटीकरण करणे.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)
शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०१९/प्र.क्र.०८/आव्यप्र-१
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दि. १६ मे २०२३

वाचा:- १) शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०१९/प्र.क्र.०८/आव्यप्र-१, दि. ९ नोव्हेंबर, २०२२.
२) शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०१९/प्र.क्र.०८/आव्यप्र-१, दि. २३ जानेवारी,२०२३
३) कार्यालयीन आदेश क्र. आव्यप्र-२०१९/प्र.क्र.०८/आव्यप्र-१, दि. ३१ जानेवारी, २०२३
४) शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०१९/प्र.क्र.०८/आव्यप्र-१, दि. १५ मार्च,२०२३

**प्रस्तावना:-**

राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाने देशातील आपत्तीप्रवण जिल्ह्यांपैकी मागास असलेल्या जिल्ह्यांतील जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाच्या बळकटीकरणासाठी १००% केंद्र पुरस्कृत योजना राबविण्याबाबत निर्णय घेतला त्यानूसार राज्यातील ४ मागास जिल्ह्ये जळगाव, नंदुरबार, गडचिरोली व नांदेड जिल्ह्यांचा त्यात समावेश आहे. सदर योजना राबविण्यासाठी उपरोक्त ४ जिल्ह्यांत जिल्हा आपत्ती व्यवस्थापन सल्लागार नियुक्त करण्यात आलेले आहेत.

जिल्हा आपत्ती व्यवस्थापन सल्लागार यांचे माहे फेब्रुवारी, २०२३ पर्यंतचे मानधन संदर्भाधिन शासन निर्णय ४ अन्वये अदा करण्यात आलेले असून माहे मार्च, २०२३ व एप्रिल २०२३ चे मानधन अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तथापि, वित्त विभागाने मंजूर केलेल्या तरतुदीच्या १० % निधी ( रु. ३.३६ लक्ष) वितरीत केल्याने केवळ मार्च २०२३ चे मानधन वितरीत करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

राज्यातील मागास जिल्ह्यांतील जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाच्या बळकटीकरणासाठी नियुक्त करण्यात आलेल्या जिल्हा आपत्ती व्यवस्थापन सल्लागार जळगाव, नंदुरबार, गडचिरोली, नांदेड यांचे माहे फेब्रुवारी, २०२३ पर्यंतचे मानधन अदा करण्यात आले असून चार जिल्हा आपत्ती व्यवस्थापन सल्लागार यांचे ७०,०००/- प्रती माह याप्रमाणे माहे मार्च २०२३ महिन्यांचे एकूण मानधन रु. २,८०,०००/- (रुपये दोन लक्ष ऐंशी हजार फक्त) इतकी रक्कम अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर निधी संबंधित जिल्हाधिकारी यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (BDS) वितरीत करण्यात येईल. त्याचा तपशिल पुढीलप्रमाणे –

| अ.क्र. | जिल्हा आपत्ती व्यवस्थापन सल्लागाराचे नाव | जिल्हा | मानधन |
|---|---|---|---|
| १ | श्री. प्रशांत वाघमारे | जळगाव | ७०,०००/- |
| २ | श्री. सुनिल गायकवाड | नंदुरबार | ७०,०००/- |
| ३ | श्री. कृष्णा रेड्डी | गडचिरोली | ७०,०००/- |
| ४ | श्री. सागर वळंजू | नांदेड | ७०,०००/- |
| **एकूण** | | | **२,८०,०००/-** |

या कामी होणार खर्च मागणी क्र. सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०९ जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणचे बळकटीकरण करणे (०९)(०१) राज्यातील ०४ मागास जिल्ह्यांच्या आपत्ती व्यवस्थापन कक्षाचे बळकटीकरण (१००% केंद्र पुरस्कृत योजना) (२२४५ ४१०५) ३१ – सहायक अनुदाने या लेखाशिर्षांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात उपलब्ध तरतुदीतून करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०२३०५१६१७१८५९७३१९** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(हितेंद्र दुफारे)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत –

१) विभागीय आयुक्त, नाशिक/नागपूर.
२) जिल्हाधिकारी, जळगाव, नंदुरबार, गडचिरोली व नांदेड.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल (लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर.
५) निवडनस्ती/आव्यप्र-१.